**अनमोल प्रतिष्ठान, अहमदनगर संस्थेस कायमस्वरुपी रद्द करण्यात आलेली "राष्ट्रीय आदिवासी शिक्षण मंडळ, नागपूर व्दारा संचलित एकलव्य आदिवासी प्राथमिक, माध्यमिक अनुदानित आश्रमशाळा बांद्रा, ता. रामटेक, जि. नागपूर" ही प्राथमिक, माध्यमिक आश्रमशाळा हस्तांतरीत व स्थलांतरीत करुन मिरजगाव, ता. कर्जत-जामखेड, जि. अहमदनगर येथे चालविण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०२३/प्र.क्र.८७/का-११**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक:- ०४ जुलै, २०२३

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-२०११/प्र.क्र.३७५/का.११, दि.०७/०३/२०१३

२) महाराष्ट्र राज बालहक्क संरक्षण आयोगाचे दि. ५/३/२०१४ चे आदेश.

३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे आदेश क्र. अनुआशा.२०१६/प्र.क्र.१४/का७(३), दिनांक ०३.०८.२०१९

४) प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र., राजूर यांचे पत्र क्र. अनुआशा.२०२२/प्र.क्र.का.११ (२)/३१६४, दिनांक १२.०६.२०२३

५) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र. अआशा २०२३/प्र.क्र.४७/ का-०७(१)/३७६४, दिनांक ३०.०५.२०२३

**प्रस्तावना**

कर्जत-जामखेड या तालुक्यात व लगतच्या तालुक्यात आदिवासी विकास विभागाची शासकीय व अनुदानित आश्रमशाळा कार्यरत नाही. या परीसरामध्ये अनुसूचित जमातीच्या पारधी-भिल्ल समाजातील विद्यार्थ्यांची संख्या अधिक प्रमाणात आहे. या विद्यार्थ्यांना शिक्षणाच्या प्रवाहात आणणे यासाठी तेथे निवासी आश्रमशाळा सुरु करणे आवश्यक आहे. तसेच कर्जत-जामखेड येथे आश्रमशाळा सुरु करण्यास शिफारस संबंधित प्रकल्प कार्यालयाने केली आहे.

त्यानुषंगाने सदर भागातील प्रामुख्याने पारधी-भिल्ल समाज व परीसरातील इतर अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठी मिरजगाव, ता. कर्जत, जि. अहमदनगर या ठीकाणी राज्यातील मान्यता रद्द केलेली आश्रमशाळा हंस्तातरित करून स्वयसेवी संस्थेमार्फत चालविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय आदिवासी शिक्षण मंडळ, नागपूर व्दारा संचलित एकलव्य आदिवासी प्राथमिक, माध्यमिक अनुदानित आश्रमशाळा बांद्रा, ता. रामटेक, जि. नागपूर ही संदर्भ क्र.३ च्या आदेशान्वये

मान्यता रद्द करण्यात आलेली अनुदानित आश्रमशाळा, अनमोल प्रतिष्ठान, अहमदनगर या संस्थेस हस्तांतरित करून मौजे मिरजगाव, ता. कर्जत, जि. अहमदनगर येथे सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून चालविण्यास पुढील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

(१) उपरोक्त अनुदानित आश्रमशाळा शैक्षणिक वर्ष सन २०२३-२४ पासून सुरु करावी व शाळा सुरु केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत आयुक्त, आदिवासी विकास, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर/ नागपूर यांना त्याबाबत कळविण्यात यावे.

(२) मान्यता रद्द करण्यात आलेल्या आश्रमशाळेमध्ये कोणते वर्ग सुरु होते व किती पदास मान्यता होती. तसेच शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी किती होते याबाबतची माहिती प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांनी अनमोल प्रतिष्ठान, अहमदनगर या संस्थेस कळवावी.

(३) अनमोल प्रतिष्ठान, अहमदनगर या स्वयंसेवी संस्थेने शिक्षक- शिक्षकेत्तर कर्मचा-यांची नियुक्ती करताना शासनाने विहित केलेल्या अटी-शर्ती व नियमांचे पालन करावे. विहित अर्हताप्राप्त कर्मचा-यांची नेमणुक न केल्यास संस्थेस देय असलेले अनुदान अनुज्ञेय असणार नाही. प्रकरणपरत्वे आश्रमशाळेची मान्यता रद्द करण्यात येईल. अप्रशिक्षित शिक्षक उमेदवारांची नियुक्ती केल्यास त्यांच्या वेतनाची जबाबदारी शासनाची राहणार नाही व त्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील याची संस्थेने नोंद घ्यावी.

(४) आश्रमशाळेतील आवश्यक पद भरतीसाठी अपर आयुक्त, नाशिक यांची मान्यता घेण्यात यावी. तसेच पदमान्यता देताना संदर्भाधीन दिनांक ११.०६.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदींचे पालन करावे.

(५)नवीन संस्थेने आश्रमशाळेत वर्गखोल्या व निवासाची स्वतंत्र इमारतीमध्ये व्यवस्था करावी. तसेच इमारतीमध्ये मानकाप्रमाणे स्नानगृहे, शौचालये उपलब्ध करुन द्यावीत आणि शुध्द पाण्याची मुबलक व्यवस्थाही उपलब्ध करून द्यावी.

(६) अनमोल प्रतिष्ठान, अहमदनगर या स्वयंसेवी संस्थेस शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या सुत्रानुसार नुसार अनुदान अनुज्ञेय राहील.

(७) संस्थेने अनुदानित आश्रमशाळासाठी 'आश्रमशाळा संहिता' तसेच शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी, शर्ती व नियमांचे पालन करावे.

(८) अनमोल प्रतिष्ठान, अहमदनगर या संस्थेने सदर आश्रमशाळा अन्यसंस्थेस चालविण्यास देवू नये.

(९) बालकांचा सक्तीचा व मोफत शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ अंतर्गत नमूद करण्यात आलेल्या सोयी-सुविधा विद्यार्थ्यांना उपलब्ध करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

(१०) प्रत्येक वर्गात किमान ४० निवासी व १० बहिस्थ विद्यार्थी असावेत.

(११) शासनाने विहित केलेल्या अटी, शर्ती व नियमांचे पालन न केल्याचे निदर्शनास आल्यास तसेच उपरोक्त आश्रमशाळेबाबत गैरव्यवहार/गैर व्यवस्थापन याबाबत तक्रारी आल्यास संस्थेच्या आश्रमशाळेची मान्यता रद्द करण्यात येईल.

(१२) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांनी वरील संदर्भ क्र. १ मधील नमूद शासन निर्णय दि. ०७ मार्च, २०१३ मधील तरतुदीच्या अनुषंगाने संस्थेकडून आवश्यक त्या कागदपत्रांची पूर्तता करुन घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०३१५५११५४८८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2023.07.04 18:00:51 +05'30'

**(उदय ग. गवस)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव यांचे कार्यालय, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. लोकआयुक्त आणि उप लोकआयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र राज बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई-१८
८. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
९. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर/नाशिक
१०. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
११. जिल्हाधिकारी, नागपूर/अहमदनगर
१२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. सहसंचालक, महाराष्ट्र राज्य, नागपूर/पुणे
१४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर /नागपूर
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद, अहमदनगर
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१९. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, अहमदनगर.
२०. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, अहमदनगर
२१. विभागीय सहसंचालक, पुणे
२२. अध्यक्ष/सचिव, अनमोल प्रतिष्ठान, अहमदनगर